# भावतरंग



वा. गो. मायदेव, एम्. ए.

१९२९

किंमत १ रुपाया

# परिचय



प्रो० मायदेव यांच्या कवितांतील कांहीं चुटके पूर्वीं मीं मधून मधून ऐकले होते; पण आपल्या सर्व कविता एकत्र छापून प्रसिद्ध करण्याच्या प्रसंगानें त्यांनीं या बहुतेक सर्व कविता मला गाऊन दाखविल्या; आणि त्यांना उद्देशूनच खालील दोन शब्द लिहीत आहे. प्रो० मायदेव यांच्या कवितांचा पसारा थोडा असला तरी त्यांत विविधता पुष्कळ आहे. लहान मुले, कुलीन स्त्रिया, ग्रामवासी स्त्री-पुरुष, शेतकरी यांपासून तों प्रेमळ तरुण व गंभीर तत्त्वज्ञानी या सर्वांची अभिरुचि संतुष्ट करणाऱ्या कविता या कवितासंग्रहांत सांपडतील. वृत्तांच्या बाबतींत जुनें व नवें या दोन्हींविषयीं समान प्रेम मायदेवांनीं प्रकट केलें आहे. म्हणजे कांहीं कविता अगदीं साध्या जुन्या पद्धतीच्या वृत्तांत रचलेल्या असल्या तर दुसऱ्या कांहीं गायनोपयोगी अशा नव्या चालींवरही रचलेल्या आहेत. या दुसऱ्या प्रकारच्या कवितांसंबंधानें कदाचित् एक गोष्ट अशी घडण्याचा संभव आहे कीं, मायदेव यांनीं त्या स्वतः गुणगुणत रचल्या परंतु पुष्कळ वाचक त्या सामान्य पद्धतीनें वाचणार, यामुळे त्या गुणगुणत रचतांना जे ठसके व जे आवेशयुक्त उच्चार मायदेव यांना केल्यामुळें कवितेचें हृदयंगमत्व स्वतः त्यांना प्रतीत झाले तसें तें सामान्य वाचकाला होणार नाहीं. तथापि भाषा स्वाभाविक सोपी व कर्णमधुरही असल्यानें वाचकाला वरील प्रकारची हानी फारशी भासणार नाहीं. विचाराच्या दृष्टीनें पाहतां प्रेमळपणा व शुचिर्भूत-पणा आणि कलेच्या दृष्टीनें कृत्रिमतेचा अभाव हे मुख्य गुण या कवितांत मला आढळले. तसेंच प्रणयापेक्षां वत्सलता ही त्यांच्या कवितेंत एकंदरीने अधिक भिनलेली दिसून येईल. वाचतांना मनास लज्जा उत्पन्न करणारा जसा एकही शब्द या कवितांतून सांपडणार नाहीं तसाच दुर्मनस्कता किंवा खेद उत्पन्न होईल असाही शब्द क्वचित्च आढळेल. संसारांतील दुःखाला अनु-लक्षून एकादी कविता असली तरी निराशा उत्पन्न न करतां ती फक्त

अनुकंपाच उत्पन्न करील. विनोदी कवितांचे मासलेही फार चांगले आहेत. स्वतःच्या काव्यानंदांत गढून गेलेल्या काव्यवेड्या नवऱ्याचा उपालंभ त्याच्या नीरस पण प्रांजल स्त्रीनें जींत केला आहे ती कविता हल्लींच्या दिवसांत काव्यप्रिय तरुणपिढीनें नित्य डोळ्यापुढें ठेवण्यासारखी आहे. तसेंच आय्. सी. एस् नवरा मिळण्याचें ध्येय डोळ्यापुढें ठेवणाऱ्या सुशिक्षित तरुणीचेंही निंदाव्यंजक चित्र चांगलेंच रंगविलें आहे. तसेंच शेतकऱ्यांच्या संबंधानें केलेलीं वर्णनें जर शेतकऱ्यांना गाऊन ऐकविलीं व त्याहीपेक्षां त्यांना म्हणण्याला अनुकूल अशा लावण्यांच्या वृत्तांत तीं असल्यामुळें त्यांनाच तीं म्हणावयाला शिकविलीं तर त्यांना तो एक नवा आनंदच मिळवून दिल्यासारखें होईल. कारण शेतकरी वर्गही हळुहळू शिक्षण मिळवूं लागलेला असून ग्राम्य व नागर या वर्गांतील अंतर हळुहळू तुटत चाललें आहे. सीता, देवकी, शबरी यांचे उद्गार गोंविलेल्या कविता स्त्रियांच्या तोंडीं भक्तिभावानें खेळण्यासारख्या आहेत. प्रो० मायदेव यांना कविवर्य तांबे यांच्या कवितांचें प्रेम फार आहे हें मला माहीत नसतें, तरी ढब व अभिरुचि यांच्या दृष्टीनें मायदेव यांची कविता त्यांच्या आवडत्या कवीच्या काव्याला जुळती आहे असेंच मीं म्हटलें असतें. गाऊन दाखविण्याच्या दृष्टीनें यांतील कोणचीही कविता फार लांब नाहीं हा तिचा गुणच म्हणावासा वाटतो. तसेंच मुलांनीं म्हणण्यासारख्या कविता फार चांगल्या असून त्या प्राथमिक शाळांच्या समारंभांमधून अवश्य उपयोगांत आणल्या जाव्या. प्रो० मायदेव यांच्या कवितेंत भरारीच्या कल्पना व नवीन उपमादि अलंकार फार नसले तरी त्यांच्या काव्यरचनेंत ठाकठीकपणा असून भावना खोल असते. अशा रीतीनें या संग्रहाचें सामान्य स्वरूप वाचकांच्या निदर्शनास आणलें तरी त्यांच्या कवितांचे चांगले नमुने म्हणून खालील कवितांचा विशेष रीतीनें उल्लेख करून वाचकांनीं त्या अवश्य वाचाव्या अशी शिफारस मी करतो. 'गाई घरा आल्या', 'जगीं गरिबांचें नाहिं कोणि वाली', 'बाइल बाळापुन नाहीं', 'बाळा व भामा', 'खडी फोडणारा', 'हा हिंद देश माझा', 'खचतो माझा धीर', 'इरलेवाली', 'सुंदरी',

## परिचय

'गोफणवाली', 'तिथे माझी असणार नाहिं आई', 'अशी कशी', 'पांखरूं', 'जरा तरी बघ हंसून', 'आंसवें येती मम नयनीं' वगैरे. तथापि ज्यांना या कविता स्वतः मायदेव यांच्या तोंडून ऐकण्याला मिळण्यासारख्या असतील त्यांनी तर ती संधि कधींही दवडूं नये, असा इषाराही मी देतो. कारण त्यांच्या कविता नुसत्या वाचल्यानेंही गोडी येईल, तरी त्यांच्या मधुर कंठांतून निघालेल्या त्या ऐकल्या म्हणजे ती गोडी दसपट वाढते.

पुणे,
ता. २५।४।२९

न. चिं. केळकर



# निवेदन

या लहानशा संग्रहांतील भावगीतें मीं पुष्कळांना वेळोवेळीं वाचून दाखविलीं. त्या सर्व वेळीं श्रोत्यांनीं सदर भावगीतें छापण्याबद्दल मला आग्रहानें सुचविलें. ती सूचना ध्यानांत घेऊन व बेळगांवास साहित्य-संमेलनाचे वेळीं आपलेकडून होईल ती अल्प सेवा मराठी-साहित्यांत रुजू करावी म्हणून हीं भावगीतें छापण्याबद्दल मीं घाई केली. हा माझा मानस माझे मदतीस श्री० **तात्यासाहेब केळकर** व **गोखलेबंधु** न येते तर अपुरा राहिला असता. वेळांत वेळ काढून हीं भावगीतें ऐकून तात्यासाहेबांनीं अभिप्रायादाखल दोन शब्द लिहिले व गोखलेबंधूंनीं तर छपाई वेळेवर व चांगली होण्यासाठीं अतिशय मेहनत घेतली. या तिघांच्या आपलेपणाबद्दल मी कृतज्ञतापूर्वक आभार मानतों.

शेवटीं रसिकांस हीं भावगीतें सादर करण्यापूर्वीं एक शब्द लिहा-वासा वाटतो कीं, हीं भावगीतें निरनिराळे हेतु मनापुढें असतांना आनंद वाटून लिहिलीं आहेत. ते हेतु व प्रसंग कळावे म्हणून शेवटीं थोड्याशा टीपा दिल्या आहेत. त्या टीपा वाचून हीं गीतें वाचलीं तर जास्त आनंद होईल असें वाटतें. ह्या गीतांनीं माझ्या मनास तर आनंद दिलाच आहे; पण इतरांनाही जर तसाच आनंद झाला तर छापण्याचें चीज झालें असें मला वाटेल.

हिंगणें,<br>
अनाथबालिकाश्रम<br>
२५।५।२९

**वा. गो. मायदेव**



# तरंग-क्रम

## भावतरंग

## तरंग-क्रम





: : : १ : : :

# कवनें कुणास दावूं ?

चाल—रसने न राघवाच्या

रसिका ! तुझ्याविना मी कवनें कुणास दावूं ?
बहिऱ्या जनापुढें का गानास गोड गाऊं ?

बाळीस जन्म नुसता देण्यांत सौख्य काय ?
सर्वां प्रमोद त्याहिं झाल्यास धन्य माय !

माता बघे, स्वबाळां हर्षें हनू धरून
स्ववयाहि विस्मरून कटिंखांदिं घेत कोण ?

चातुर्य भांवयांचें चापल्य लोचनांचें
माधुर्य हांसण्याचें पाहून कोण नाचे ?

उचलून बालकें तीं थबकून कोण राही ?
साश्चर्यही वदे कीं, ह्यां कोण जन्म देई ?

ह्या सर्व कौतुकांना सहजींच पाहतांना
आकंठ ऐकतांना आनंद माउलींना !

मातेपरी तसा मी सोत्कंठ कोण पाहूं ?
गाऊं कुणाकरीतां ? कवनें कुणास दावूं ?

❀ ❀ ❀

: : : २ : : :

# फिरावयास नेलें असतांना !

चाल—चंद्रकांत राजाची

“ जया ! नभीं या पाहिलेंस का काय बरें दिसतें ?
रम्य ह्यापरी कांहीं वद का तुजला आठवतें ?

सुवर्णताराग्रंफित तुजला काय वरी दिसतो ?
देवाघरच्या आईचा हा पदर मला गमतो !

प्रतिदिनिं गगनीं लोचन लावुनि शोधीं मी सदन
त्या देवानें कुठें लपविलें आईचें वदन ?

आठवते का चैत्रामध्यें गौर मांडि आई
नेसुनि असली लाल शेंदरी हळदकुंकुं देई ”

सुवर्णरेखांकित त्या मेघा बाळ विजय बघुनी
मातेचा त्यां पदर लेखुनी आठवि निज जननी

अश्रु गाळुनी रडे हुंदके देवोनी तेथें
पिता वळोनी पाही तेव्हां रडतां दोघांतें !

“ लीले, विजया ! कां रे रडतां वदत कसे नाहीं ?
कांहिं लागलें कुठें कसें वा बोला लवलाहीं ”

सांगति तेव्हां रडुनी दोघें दावुनियां मेघ
मुलें उराशीं धरुनि पिता तो आंवरि आवेग !



: : : २ : : :

# रांगोळी !

चाल—चंद्रकांत राजाची

" निळा सांवळा वाटोळा हा पाट कुणीं वरतीं
कसा कशावर असे ठेविला ? धरिला कुणिं हातीं ?

टेंकियला हा कसा कुणीं गे पडत कसा नाहीं
कोणीं दिधला टेंक अशाला ? मोठा किति ? आई !

रांगोळीचे ठिपके ऐसे कोणीं काढियले ?
लीलेपरि का वरतीं असती लहानशीं बाळें ?

लहान मोठे चोंहिंकडे हे ठिपके ठेवियले !
ओळींमध्यें नसती कां गे अजुनी जुळवियले ?

केव्हां तरि वर रेघ दिसे ही ! जुळवि कुणी खास !
'तारा तुटला' म्हणसी कां मग बघतां रेघेस ?

रोज कसे हे ठिपके दिसती, पुसत कसे नाहीं ?
उंच वरोनी वारा आई वहात का नाहीं ?

केव्हां जुळतिल ओळीमध्यें सर्वहि ठिपके गे
ह्या पाटावर चित्र कशाचें होइल मग सांगें ?"

: : : ४ : : :

## प्रोफेसर राजवाडे यांस उद्देशून

वृत्त—शार्दूलविक्रीडित

सिंधूला गगनीं कलाधर तरी
आनंदवाया असे
केकी ऐकुनि मेघगर्जित तरी
आनंदुनी जातसे
हंसांना गमलें तरी विहरण्या
जातील ते मानसा
जातां सोडुनि, आमुची परि गुरो !
होईल कैसी दशा ?

* * *

: : : ९ : : :

# हुंदक्यांचा पूल !

अंजनीगीत

चंद्र हंसत अति होता वरतीं
गारठुनी वरि तारा कांपति
वारें आलें टेंकडिवरतीं । जाउनि बसण्याचें !

भीषण काळे दगड पाळण्या
चमचमणाऱ्या वरतीं चिमण्या
ऐसा उत्सव केव्हां निजण्या । माझ्यासम छकुल्या !

म्हणुनी धावे चित्त भराभर
पाय न उचले परी झराझर
पूलहि आला, पोंचलोंच तर । म्हणुनी मीं म्हटलें !

–दचकुनि पाउल मागें केलें–
पुलावरी हें ऐशा वेळे
आहे ओढित कोण बैसलें । अश्रूंच्या माळा ?

सभोंवार चांदणें पिठाचें
त्यांत फिकें तें तोंड मुलीचें
डोळे पुसतांना बघण्याचें । भाळीं नच येवो !

"मर मर मेल्यें सर्व वर्षभर
घोकुनि घोकुनि नोटा दिनभर
होणें तेंची झालें पेपर । हातीं येतांच !"

डोळ्यांतिल मग अश्रू खळखळ
फुटुनी वाहति गालीं ओघळ
हुंदहुंदक्यांचा हा पूल । म्हणुनीयां म्हणती !

ॐ ॐ ॐ

: : : ६ : : :

## फुलास !

चाल—भूपती खरें

हिंडलों आजवरि वनीं उपवनीं भारी
परि भाग्यें दिसलें सुम हें चेतोहारी !

कंटकीं अवास्तव ऐशा जागीं तुजला
जन्मास तरि कसा प्रभुजी देता झाला ?

वद दिव्य मंद परि हास्य सुमा कोठोनी
आणिसी जयानें टाकिसि मज मोहोनी ?

मधु मधुर मोहवी क्षणभर लोकीं ऐसें
भारिसी परी तूं सर्वदाच मज कैसें ?

हा गंध कसा तव धुंद करुनि मम चित्त
दशदिशा फिरवितो गात तुझ्या वेडांत !

" हा उठला, गेला, वेडा खासा बनला ! "
लोकांत ऐकतों याच अतांशा बोला !

जन वदोत कांहीं कसें हंसेंही होवो
तव हास्यीं परि हें मन्मन खेळत राहो !

❀ ❀ ❀

: : : ७ : : :

# माझें गाणें !

चाल—पिवो प्यिवो पिवोजि वो

माझें गाणें ऐकाल का । गाणें ऐकाल का ?

दुडदुड ऐशी चोहिंकडे मी धावूं लागेन
अशी मी धावूं लागेन !

म्हणूं नका " ही वरची वीज नाचे येऊन
खालीं नाचे येऊन "

गालीं माझ्या नीट पाहुनी हंसूं नका कोणी
बरें का हंसूं नका कोणी !

चंद्र पहा मी भूमीवरतीं येथें नाचोनी
हांसतों येथें नाचोनी !

डोळे मिचकावोनी आतां हंसतें तुम्हां मी
बर का हंसतें तुम्हां मी !

म्हणूं नका कीं, " पहा पहा रे तारा ही नामी
चमकते " तारा ही नामी !

पृथ्वीवरची एकिकडे ती संपत्ती मापा
सारी संपत्ती मापा !

थोर परंतू ठेवा माझा त्याहुन हा पापा
माझा त्याहुन हा पापा !

ॐ ॐ ॐ

: : : ८ : : :

# आला कठिण समय तुजवरी !

चाल—सबसे रामभजन

महाराष्ट्र-वाक्सुंदरि ! आला कठिण समय तुजवरी ॥ध्रु० ॥

सोडुनि गेला कशी वदावी अभद्र ऐशी वाचा
वीरपुत्र हा तुझा लाडका वसंत गे कायमचा ॥ आला० ॥

दुःखाची तव परंपरा ही नष्ट न झाली दिसते
कृष्ण काळ सारखा खेंचितो पंकीं पाउल माते !

अवमानाचीं शतें सोशिलीं पाहुनि ज्या तव बाळा
नको मोकलूं धाय खरा हा वाली तव कोसळला !

रसिक तरुवरी छात्रसुमां जो वसंतापरी डुलवी
स्वातंत्र्याचें खेळवि वारें तो बघ धरणी सेवी !

शिष्यजनीं लाविली जयानें स्वाभिमान ही ज्योती
गेला कर्ता सुधारकाग्रणि बहुत प्रिय ज्या प्रगती !

अतां कोठला परिस्थितीशीं वीर झुंज करणारा
व्यक्तिस्वातंत्र्याचा लेशहि कधिंहि न हारविणारा !

भरतभूमिंतिल अबल जनांचा हा कट्टा कैवारी
हाय हरपला ! समाज कसचा आतां दुबळ्यां तारी !

अतां पोरकीं खरीं जाहलीं विदर्भवासी बाळें
चमकतील ना प्रेमाश्रूंनीं अतां कुणाचे डोळे !

## आला कठिण समय तुजवरी !

अतां कोणता जुन्या कवींचा खराखुरा अभिमानी
पिसेपणाही पदरीं घेउन वानिल तुकयावाणी !
नव्या कवींचा धीर हरपला जिवंत नव वाणीचा
स्वतंत्र टीकाकार लोपला महाराष्ट्र भाषेचा !
केशवसुतसम खऱ्या कवींना मुक्त करुनियां कंठ
वानिल आतां कोण वदा तरि निनादुनी दिक्प्रांत !
अतां कोठलें सभागृहांचें अभिमानें दुमदुमणें !
अतां कोठलें नसानसांतुनि रक्ताचें रसरसणें !



: : : ९ : : :

## बाळा अँगाई !

चाल—बाळा जो जो रे

बाळा ! अंगाई । अंगाई
　　निज रे । झोंपीं जाई ॥ ध्रु०॥

चिंव चिंव करणारी । चिमणी ही
　　घरटीं निजुनी राही !

वांसरू हम्माऽ । करुनीही
　　दमलें । गप्प होई !

चांदोबा वरतीं । करि घाई
　　ढगांत । निजण्या जाई !

चांद, वांसरूं । मम चिमणी
　　झोंप । कां नच अजुनी ?

* * *

: : : १० : : :

# भृंगा ! हृदय न मम कळलें !

चाल—सबसे रामभजन

मोहविण्या मन झटसी, भृंगा ! हृदय न मम कळलें ॥ ध्रु०॥

याच सरोवरिं अन्य सरोजिनि किति फुलल्या आहेत
टाकुनियां त्यां कशास धरिसी मज गरिबाचा हेत ॥ भृंगा०॥

देव कदाचित् प्रसन्न होतो प्रदक्षिणा पाहोनी
परी अशानें अर्पितहृदया जाते रे कोपोनी

हरिणासम का गानजालिं तव फसेल कुणि गुंगून ?
हृदिंच्या प्रेमा-गाना-विसरुन ऐकिल तुज कधिं कोण ?

अथवा लुटुनी विविध फुलांतिल मकरंदा स्वच्छंद
विषयलंपटापरि बघसी मज बनुनि धुंदिनें अंध ?

तरल तरंगीं बिंबित झालें रूप पाहुनी तव का
मोहुनि टाकिन कोणिहि रमणी गर्व उपजला मूर्खा ?

सौंदर्याची मीमांसा तर मुळींच तुज नच कळली
ममत्वाविणें कधीं दिसेना सौंदर्यकळी फुलली !

काय म्हणासि कीं-मेघ तयांना दिसूंहि ना देईल !
देवो ना रे-कैसा सोडिल दुष्ट वर्तना कुटिल ?

भगिनि चक्रवाकी ही माझी रात्रभरी बघ रडते !
परंतु हृदयांतिल का तीच्या प्रेमझरी ओसरते ?

काय म्हणसि कीं क्षयी जनाचें प्रेम नसे हितकारी ?
सुरनर कोणिहि पूर्ण विश्विं नच या वचना अवधारीं !

राहुकवलकृत कलंकिततनू रुचला तुजला कैसा ?
कुराजपीडित रोषकिणांकित धीर गणिति जन ऐसा

काय सांगसी ? माझ्यावरि ते प्रेम मुळीं नच करिती ?
रोहिणि रजनी रमणी त्यांच्यासाठीं निशिदिनिं झुरती !

असाच माझा नाथ असे रे उदार अति जगतांत
सहस्रगोपीमन जो रमवी लोकत्रयिं विख्यात !

लहानमोठ्या तरंगिणी किति मिळताती म्हणुनी का
टाकी सागर त्यांतें विसरुनि गंगाप्रेमा लव का ?

सांगतोसि मज त्यांना इतरीं खास असे भुलवीलें
वेड्या प्रेमपरीक्षा करण्या खूळ न तर पांघरलें ?

हृदयमंदिरीं प्रेमाचा का कुणि मांडी बाजार
प्रेमराज्यही कृत्रिम नियमीं कोण करी बेजार ?

अथवा आनंदाचें त्यांना राज्य पद जरी तेथें
मिळेल तरिही मजसम नाहीं आनंदी बघ कोठें !

त्यांना व्हावें सौख्य म्हणोनी जन्म असे हा माझा
कोठेंही तो सुखी असों दे मत्प्राणांचा राजा !

जिवाजिवाची नजर एकदां झाली ही खास खरी
कोठुनि भृंगा हृदयतरंगिणि अतां फिरे माघारी ?

पुरी खुळी मी रसिका ! लागूं नको माझिया नादीं
जाइल वेळ फुका हे साधो ! अन्य मार्ग जा साधीं !

ॐ ॐ ॐ

: : : ११ : : :

# गाई घरा आल्या !

वृत्त—ओवी

गाइ घरा आल्या । घण घण घण्टानाद
कुणीकडे घालूं साद । गोविंदा रे ?

गाइ घरा आल्या । धूळ झालि चहूंकडे
घनश्याम कोणीकडे । माझा गेला ?

गाइ घरा आल्या । वांसरें हंबरती
कुणीकडे बालमूर्ति । कृष्ण माझा ?

गाइ घरा आल्या । ब्रह्मानंद वांसरांना
काय करूं माझा कान्हा । चुकला का ?

गाइ घरा आल्या । घोंटाळति पाडसांशीं
हाय ! नाहीं हृषीकेशी । माझ्यापाशीं !

गाई घरा आल्या । पाडसांस हुंगितात
माझा मात्र यदूनाथ । दुरावला !

गाइ घरा आल्या । आंवरेना मुळीं पान्हा
राहणार भूका तान्हा । वासुदेव !

गाइ घरा आल्या । दूध वाहे झूरू झूरू
माझ्या जीवा हूरूहूरू । मुकुंदाची !

गाइ घरा आल्या । दूधवाटी राहीयेली
कुणी माझा वनमाली । गुंतवीला ?

## गाई घरा आल्या !

गाइ घरा आल्या । झालि बाइ कातरवेळ
अजूनि कां घननीळ । येना घरा ?

गाइ घरा आल्या । लावियेली सांजवात
बाळा दामोदरा रात । झाली न का ?

गाइ घरा आल्या । पाल चूक चूक करी
राख अंबे माझा हरी । असे तेथें !

ॐ ॐ ॐ

: : : १२ : : :

# अनाथबालिकाश्रम पाहून !

चाल—आनंदकंद ऐसा

हे वंद्य आश्रमा त्वां । माझे प्रणाम घ्यावे
या बालबालिकांना । सत्स्फूर्तिलागिं द्यावें
ह्या सिंह-तोरण्याच्या । उत्तुंग शैलमाला
राहोत पाठिराख्या । करिं गुंफुनी करांला
ही मंदमंद वाहो । सरिता मुठा मुमाता
वाहोनि आणु नेमें । सुमगंधयुक्त वाता
हीं हांसरीं सदाचीं । क्षेत्रें अशीं डुलोत
असहाय बालिकांच्या । हृदिं शक्ति सांठवोत
हा पूर्व-पर्वतीचा । गिरिजा-कृपाकटाक्ष
पावित्र्यरक्षणार्थीं । राहो सदैव दक्ष
गुरुराज थोर अण्णा । लाधोत हे महर्षी
त्यांच्या सुधावचानें । राहोत सर्व हर्षीं
पावित्र्य देवतांचें । व्रतितत्त्व तापसांचें
मांगल्यही गृहींचें । नांदो असें सदाचें
गुरुशिष्यभक्ति राहो । अतिपूज्य आश्रमींची
जी दूर ना कधींही । होणार या जिवांची
हतभाग हिंदभूच्या । सत्कीर्तिमंदिराची
व्हाया पुन्हां प्रतिष्ठा । चिच्छक्ति आश्रमाची !
ध्यानीं मनीं म्हणोनी । स्मरणार ह्या चरित्रा
लववीन नम्र माथा । हे आश्रमा पवित्रा !

: : : १३ : : :

# जगीं गरिबांचें कोणि नाहिं वाली !

वृत्त—दिंडी

कुंद आल्या खोलींत लक्तरांत
बाळ, गोपाळ, प्रभा झोंप घेत
मात्र माता जागते जशी ज्योत
हलुनि अंधारीं मनस्तरंगांत !

दिवस तीचे तोंडास लपविण्याचे
दिवस कष्टानें घांस आणण्याचे
दिवस निःशब्दें अश्रु गाळण्याचे
पिलां पाहोनी जीव कंठण्याचे !

प्रभा बाला ती चारु मंदहास
सानथोरांच्या पात्र कौतुकास
बुद्धिविनयांहीं मान्य ती गुरूंना
खेळिमेळीनें हवीशी सख्यांना !

*          *          *

पहा निश्चल हें सभास्थान केंवीं
स्तिमित विद्यार्थिनि गुरुहि सर्व तेंवीं
प्रभा बाला बोलते करुण बोलीं
" जगीं गरिबांचें कोणि नाहिं वाली !

गरीबांना भावना बुद्धि नाहीं
गरीबांना मानापमान नाहीं

गरीबांच्या वाटेंत कंटकांच्या
उभ्या राशी नेहमीं असायाच्या!

वकिल डाक्टर हे सर्व कुणासाठीं
असति त्यांचे ज्यांचिया वित्त गांठीं!"
बोल करुणेचे प्रभा बालिकेचे
हृदय हलवीती सर्वांचें गुरूंचें!

*　　　*　　　*

दिवस प्लेगाचे, दिवस औषधांचे
दिवस पैशाचे, दिवस डाक्टरांचे
दिवस चोरांचे, दिवस वकीलांचे
दिवस गरिबांचे स्वर्ग साधण्याचे!

'नको जाऊं! अपरात्र कोण? आई!
दूर घर तें! मी मरत खास नाहीं
कुठुनि पैसे देशील डाक्टराचे
अगऽ कोणीही नव्हत गरिबांचे!'

म्हणे डाक्टर, 'घेईन वीस बाई'
एकदांची मोटरहि ऐकुं येई
परी तत्पूर्वीं त्यजुन बाळ गेली
म्हणत 'गरिबांचें कोणि नाहिं वाली!'

: : : १४ : : :

## ये सत्वर हरि ! उद्धरीं !

चाल—जिवलगे संगिं मम सारा

गोविंद मुकुंद मुरारी । ये सत्वर हरि उद्धरीं । ॥ ध्रु० ॥

घेरिलों बुद्धिवादानें
भुलविलों तर्कनादानें
संपलों नीच संगानें
कशि तरी गती कंसारी । ये सत्वर हरि उद्धरीं !

अजवरी जिवाचा मित्र
लाधेल अशा आशेंत
राहिलों, परंतु न दिसत
तुजवीण कोण जो तारी । ये सत्वर हरि उद्धरीं !

पाहिलें आजवरि भंवतीं
कोणती वस्तु दे सुख ती
छे ! कुठें न चित्ता शांती !
वाटते भीति संसारीं । ये सत्वर हरि उद्धरीं !

सोडिला स्वार्थ हा डंका
मांडुनी जमविलें लोकां
हा ! फसवूं ये परि तुज का ?
छे, न मी पाप उच्चारीं । ये सत्वर हरि उद्धरीं !

मत्सर क्रोध अभिमान
प्रतिनिमिष करिति थैमान
जाणार काय टाकून
प्रभु तूं मज भवकान्तारीं ? ये सत्वर हरि उद्धरीं !

एवढी विनंती माझी
आंवरिं हा मानसवाजी
राहुनि मम हृद्यामाजी
तुजवीण कोण हा वारी ? ये सत्वर हरि उद्धरीं !

* * *

: : : १९ : : :

# आहें मी, बाळ हो उगी !

वृत्त—अनुष्टुप्

बागुलाच्या भयें खोट्या अंधारीं कांपलों जधीं
धीराचा गमला शब्द 'आहें मी, बाळ हो उगी !'
कुतू, काऊ, मनू माऊ स्वप्नीं ये चावण्या जधीं
धीराचा गमला शब्द 'आहें मी, बाळ हो उगी!'
भांडतां सांडतां सज्ज दापाया जन हे जधीं
धीराचा गमला शब्द 'आहें मी, बाळ हो उगी !'
काळ, शत्रू, भयें नाना जाचती मजला जधीं
आतां कोठून ये शब्द 'आहें मी बाळ हो उगी' ?

* * *

: : : १६ : : :

# नको हें, नको तें ! असे काय येथें ?

वृत्त—सुमंदारमाला

नको दाम देणें, नको काम घेणें, सचोटी जगीं या मुळीं ना वसे
नको दान देणें, नको पुण्य घेणें, कृतघ्नांमुळें सर्व कांहीं फसे !

नको ज्ञान देणें, नको हे बहाणे, जगीं स्वार्थ हा एक राजा पहा
नको पूज्य होणें, नको कीर्त होणें, अती शाहण्याचा असे मंत्र हा !

नको स्नानसंध्या, नको देवपूजा, उगा अंतरीं दंभ माजेल ना !
नको ध्येयभक्ती, नको संतसेवा, फुका कां वहा देह खोट्या जनां ?

कशा ग्रंथ वाचा ? कशा कीर्तनाचा रिकामा धरावा मना छंद हा
नको देशभक्ती खुळी ही प्रवृत्ती, अती शाहण्याचा असे मंत्र हा !

'नको हें नको तें, असे काय येथें' असा घोकुनी मंत्र बाराक्षरी
किती नाश झाला, पहा काय गेलें ! अती शाहण्या मन्मना ! अंतरीं !

: : : १७ : : :

## बाइल बाळांपून नाहीं !

चाल—लोकगीतासारखी

माथां मळकट बत्ती कंदी
अंगीं फाटकि बाराबंदी
खांदीं काळी काळी वादी
सापावाणी !
ओंटी पाठिं कशियेली
अरगड भरली पायली
मुठीमागें मूठ घाली
चाडामाजी !
दिसती मणगटें दणकट
दणूदणू चालति भरले पट
फुगती शिरा तटातट
गातां गीत !
हलते झुलते पाभर
डुलते कीटाकीटांवर
बैल ओढिति झराझर
मोडुनि मान !
भरुनी आलें काळें पाणी
वीजा जाती चकाकोनी
बैल दावी, मारी, हाणी
घातेसाठीं !

माझ्या दादा र् चितर् गोजा
नका नका र् करूं मौजा
आला आला र् मेघराजा
किरपावंत !
आतां नका र् कुचरा
खातिल कच्चींबच्चीं चारा
टाकुनी गेलि र् पोरीं थोरीं
धनिण तुमची !
उचला पाय झरा झरा
आल्या सांडायाला धारा
दया आली परमेसरा
हला बाबा !
अग तूं कोण बांधावर ?
कां ग उभी कां सुंदर ?
टाकूं नको ग नजर
होईं दूर !
नाहिं ग बोलायाची वेळ
आली घात ग जवळ
खातिल काय पोरंबाळं
परदेशी !
जा-जा ! नाहीं तर नाहीं
बाइल बाळांपून नाहीं !
बाळांपून बापा नाहीं
थोर कांहीं !

* * *

: : : १८ : : :

## बाळा व भामा !

चाल—माथा मळकट बत्ती

हिरवी कंचुकी सुंदर
तंग दाखवी पदर
चटचटां चालली पोर
सत्यभामा !

खांदीं कावड झोंकदार !
अंगीं सदरा जाळीदार
काढुनि छाती पेलेदार
चाले बाळा !

पायीं करकरती वहाणा
झोंकें चाले गवळीराणा
हर्षे पाही हरिणनयना
उभी भामा !

वळुनी पाहे क्षणभर
करणी केली घनघोर
टाकली वांकडी नजर
एकवार !

वीज कोसळली खालीं
वीरवृत्ति गोंधळली
कावड ठेवुनि भूमितळीं
उभा ठेला !

सूर्य आला तैसा गेला
मार्गी बाळा तरि उगेला
परतुनि नारी म्हणती ‘बाळया !
दीस गेला !

हरिणी इतुक्यांत धडपडे
पवती पाठीशीं दारुडे
भयें किंचाळोनी रडे
अंधारांत !

लोळवीलें एका दोघां
पळ[illegible]लें तिघां चौघां
बघण्या गेला गवळीदादा
भ्याली कोण !

‘राव कोण सरदार
देवाऐसे वेळेवर
सरसावला पुढें वीर
धांवोनीयां ?’

वरी चंद्रकला आली
क्षण दृष्टादृष्ट झाली
गळां करमाळा घाली
सत्यभामा !

* * *

: : : १९ : : :

# भूत आणि भविष्य

वृत्त—दिंडी

कडेवरतीं घेऊन नातवास
निघति आजोबा मौज दाविण्यास
मौज दावियली, दिसलि कीं कशांत
मला ठावें ना, स्मरे दृश्य मात्र !

वृद्ध टाकी हळुहळू पावलांस
कडेवरतीं शिशु झाडि तोरड्यांस
कडेवरुनी दिसलि त्या मौज कांहीं !
दूर व्हाया सत्वरी करी घाई !

धरुनि धरुनी कवळण्या वृद्ध पाही
परी उतराया बाळ हट्ट घेई
स्मरुनि दृश्या त्या क्षणीं मनीं येतें
असें जखडीतो भूत भविष्यातें ! .

: : : २० : : :

# मित्राच्या बहिणीस पाहून !

स्वानंत

बाळे ! ऐकियलें कितीतरि तुझ्या स्तोत्रांस रात्रंदिनीं
माझ्या ह्या व्यवसायबांधवगणीं तीं सांगतां वानुनी
सर्वा सांठविलें गणूनि धनवज्जिव्हारिं लोभ्यापरी
कीं ह्या सद्गुणसंचया कधिंतरी पाहीन डोळेभरी !

माझ्या पुण्यबळें अजी उगवला तो सूर्य माझ्यापुढें
होईना मज धीर पाहुनि तुझ्या पावित्र्यतेजाकडे
सांगे मी मम मानसा, बघ जरा, सांठीव जें दीसतें
केला धीर परंतु पाहुनि तुला मच्चित्त हेलावतें !

नेत्रें चंचल कीं, खळी चिमुकली ओंठासमीपीं दिसे
किंवा नासिक नें सतेज, तव कीं हास्यांत गोडी वसे
ठावें ना मज काय काय सजतें माझ्यापुढें आणण्या
मन्मित्रा तव बंधुसी झणि सये ! स्वर्गांतुनी भेटण्या !

जातों विस्मरुनी क्षणीं तुजासि मी ही ना अवज्ञा गणीं
ही मूर्ती तव बंधुची उभि पुढें ! मी मग्न पारायणीं !

❀ ❀ ❀

: : : २१ : : :

## नित्याच्या अवलोकनें मन पहा होतें किती आंधळें !

स्वनित

होती वेळ सकाळची कितितरी आनंददायी मना
होत्या उत्सुक शिष्यिणी मजपुढें काव्यामृता सेवण्या
त्यांच्या चित्तसरोरुहां फुलवितां आनंदुनी जाउनी
गेलों विस्मरुनी कितीक विधवा त्यांतील कष्टी मनीं !

सांगें मी पुढतीं तयां नवनव्या काव्यांतल्या कल्पना
दुःखातें गिळुनी उठाण मन घे त्यांचें रसा चाखण्या
जाई पक्षिणि उंच उंच वरतीं सांगे पिलां वैभवं
तेंवीं बालमनांपुढें वदत मी काव्यार्थिंचा गौरव !

एकाकीं इतक्यांत कोणिं मजला बाहेरि संबोधिलें
माझ्या काव्यसमाधिंतून मजला जागें करूनी दिलें
गेलों बाहिर मी सवेंचि चरका माझ्या मना बैसला
आठांची पुरती न बालविधवा पाहें पुढें कोमला !

वैधव्यीं किति दुःख तें निमिषिं या दृश्यामुळें बिंबलें
नित्याच्या अवलोकनें मन पहा होतें किती आंधळें !



: : : २२ : : :

# बाललीला !

वृत्त—दिंडी

विचारांमीं मी कांहिं होउनीयां
नेत्र मिटले आडवा होउनीयां
तोंच उघडोनी दार बाळ पाही
असें वाचित कीं काम करीं कांहीं !
झोंप लागलि समजून हळुच चालें
टेबलाशीं खुर्चीस ओढियेलें
चढुनि कष्टें खुर्चींत मग बसून
पाहियेलें मेजास न्याहळून !
ग्रंथ दउती पेन्सिली रबर टांक
वस्तु पडल्या टेबलावरि अनेक
कळी नाखुष जी सर्व करिं धरून
क्षणीं फुलली चष्म्यास विलोकून !
ठेवि चष्मा मग कसाबसा नाकीं
ग्रंथ इंग्रजि उलटाच धरी हातीं
रेळुनीयां मेजास लावि पाय
येस नो च्या वाचनीं दंग होय !
झणीं आरशि दिसणार फोडलेली
म्हणुनि मन्मानिं चुळबूळ चाललेली
जरी अंतरिं घाबरा जीव झाला
हंसूं लोटे मज बघुनि बाललीला !

* * *

: : : २३ : : :

# खडी फोडणारा !

स्वनित

" हो–दादा !–अगदीं असाच मुलगा !–सांगूं तुम्हां काय ते
लीला मांडिति बालगोप असले मातापित्याभोंवते
कष्टांचे कसलेहि डोंगर पहा नाहीं कधीं भासत
जेव्हां हीं भंवती फुलें विकसतीं खेळोनियां हांसत !

राशी ह्या खडिच्या अम्हीं उठवल्या साहोनि वारा उन—
ह्या–ऐसा हंसरा असाच चिमणा गेला अम्हां टाकुन !
माझ्याभोंवतिं ह्या जमून सगळ्या आकाश भेदीतशा
बाया सांगत–धीर मींच दिधला–छे ना रडा गे अशा—

देतांना अपुणांस बाळ पुशिलें नाहीं तयें आपणां
नेला आज गडी तसाच, रडुनी येणार का तो पुन्हां ?
सांगा का दुसरें असे तरि खरें ? दादा ! मला आपण "
गेलों मी स्तिमितत्व पावुनि मनीं बोलांस त्या ऐकुन !

तीं रस्त्यावरचीं जनें गरिबशीं येती मनीं भाबडीं
अश्रुक्लिन्न गमे अजूनि वदतो तो फोडणारा खडी !

❀ ❀ ❀

: : : २४ : : :

## मित्रास !

चाल--सुनो हे

सदिच्छेनें गड्या ! कार्यीं सदाचा राहिं गुंगून  
कधीं उत्साह चित्ताचा नको देऊं दुरावून

जगीं तूझ्या प्रयत्नांचें जरी झालें न तें चीज  
तरी तूझ्या शरीरातें प्रयत्नीं पावुं दे झीज

विपत्तींना न भीं धैर्यें सदा राहीं उभा ताठ  
प्रयत्नांचा खरा वाली प्रभूजी राखितो पाठ !

ॐ ॐ ॐ

: : : २९ : : :

# पश्चात्ताप !

स्वगत

"छे, छे ! पाहुं नको अशी झटदिशीं होऊनियां निष्ठुर
होवो स्पर्श न, नेत्र रूप तरि हें पाहोत डोळेभर
हो-तूं क्रुद्ध अशी अजून बघशी कां तें मनीं बिंबलें
हो-ह्या हातिंच आज रात्रिं सखये ! मातेसि म्यां ताडिलें !

ह्या तोंडें पिउनीच-सांगति-शिव्या होतों किती मोजित
ह्या हातीं घरचीं दिलीं चिरगुटें फेंकोनियां आगींत
थंडीनें रडतां मुकीं तव मुलें म्यां निर्दयें डागिलीं
सारें आठवतें, अतां गमत ही काया न कां पेटली !

होतो धीर न मन्मनास लवही मुद्रा तुझी पाहुनी
क्षुब्धा तूं थरकांप देह करिसी स्वर्गांतुनी येउनी !
छे ! तूं जाउं नको-उभी क्षण सखे !-मातेस हा वंदितों
हीं मी घट्ट उरास आपुलिं मुलें ओढूनियां लावतों !

ही पोथी बघ साक्ष, कंठिं तुळशीमाळा पहा घातली
भेटी दे मधुनी कधीं तरि सये ! दारू पहा सोडली !"

* * *

: : : २६ : : :

# डॉक्टरचे दारांत !

स्वनित

" ही ना ? ही दिसते उमा-जवळची ह्या सोमवारांतिल—
पाटीवालि-हिला मुलेंहि असतीं, मोठा पहा त्यांतिल
त्याचें नांव सगा-अहो कशि इथें येऊन ही वारली ?
का आणून अशी कुणीं तरि खळें मारूनियां टाकली ?

छे-हो ही अगदीं गरीब, जवळी कांहीं नसे बापडी—
कष्टें मेळवि एक एक दमडी-चारी पिलां तेवढी—
झालें काय हिला ? कशी दिसत ही मागें ? करारी किती ?
हाडें ना नुसतीं अतां उरत हीं-झाली कशी ही गती ?

गेल्या वर्षिं हिचा सगा म्हणुनि जो मोठा असे पोरगा
प्लेगीं सांपडला-कथूं मग हिची त्रेधा कशाला बघा ?
आली धांवत ! पायिं काय पडली ढाळोनियां आंसवें
'देवा, औषध द्या चला,' वदलि 'मी देईन पैका बरें' !

त्या पैशांतिल दोन मात्र रुपये होते तिचे राहिले
ते का ? हो करिं-धन्य ! तेच दिसती सच्च्या जिवें आणिले " !



: : : २७ : : :

# चिलयाख्यान

वृत्त—दिंडी

करीं वीणा घेवोनि विधीसूत
हरापाशीं पातला अकस्मात
नवल भूवरचें पुसे, भक्तराज
म्हणे नारद तें "पाहियलें आज

कांति-नगरीं तव भक्त सत्त्वशील
दिसलिं भार्यापति चांगुणाश्रियाळ
जगीं सगळ्यांचें कोड पुरवीती
अशी कोठें ना पाहियली रीती"

ऐकुनीयां शिव वदे नारदास
'निघालों हा पाहण्या श्रियाळास'
क्षणीं धरिलेंसे रूप अमंगळ
पुसे कोठें राहतो नृप श्रियाळ

क्षणीं वार्ता पोंचली राजयास
पती भार्या धांवती वंदण्यास
म्हणति 'देवा कोणता हेत चित्तीं'
मुनी सांगे 'मी क्षुधित असें अती'

'पाकनिष्पत्ती कशी करूं सांगा!'
म्हणे 'शिजवीं मजसाठिं बाळ तूझा'
शिरीं कोसळली वीज भूपतीच्या!
हाय! मातेतें फुटे न ती वाचा!

क्षणामाजी परि मोह आंवरीला
बाळ मातेनें त्वरें बोलवीला
बाळ चिलये तो चिमुकल्या करांहीं
काय ठावें त्या कशा बाहि आई !

सांग "माते ! बाहिलें मज कशाला ?
खेळ रंगामधिं काय सांगुं आला !
कां ग आई ! तूं अशी पाहसी ही
कां ग माझ्याशीं बोलतही नाहीं ?"

" बाळ चिलया ! बोलतें, ऐक ऐक
चिरुनि तूतें मागतो आतिथि एक "
" ऊठ, माते ! मग काय असे त्यांत
चिरुनि देई मज, न मी हलावें कंठ "

सुरी हातीं घे माय शिर चिराया
परी माया लागली उर चिराया
" जन्मजन्मीं तुझियाच पोटिं, आई !"
बाळ बोले, " येईन, करीं घाई "

" जाइं बाळा ! जा सोडुनियां जाईं
धाव घेईं शिवचरणिं धाव घेईं "
सुरी मागुति चरचरा चालवीली
देव रडती ढसढसा अंतराळीं

शरिर तोडुनियां मांसखंड केले
मुखीं शिवशिव घोषणा सदा चाले
करीं घेता मुखकमल खंडण्यास
मोह मातेच्या मोहवी मनास

समाधाना मुखकमल ठेवियेलें
मांस शिजवोनी पात्र मांडियेलें
अतिथि होउनियां क्रुद्ध म्हणे, " राजा !
कसा ऐसा उपमर्द करिसि माझा

पुत्रवदना ठेवून कशालागीं
मनीं वांछिसि संतोषविण्या योगी
पहा जातों " म्हणतांच पद धरून
पतीपत्नी विनवीत मुनीजन

" देवदेवा ! सांगाल तसें एकूं
नका आम्हां परि दूर असें टाकूं "
अतिथि सांगे, " मज रडें नावडे हें
गीत गाउनि मस्तका कुटूं दे हे "

" नीज चिलया ! बालका शिवस्वरूपा
योगमायेच्या अंकिं नीज बापा
बाळ अजुनी तूं अम्हां लाजवीलें
योगियांही असाध्य साध्य केलें "

पुन्हां मांडियलें पात्र आदरानें
मांस शिजवोनी वाढिलें सतीनें
अतिथि बोले 'एकला न मी बैसें
पात्र राजाचें मांड मजसरीसें'

राय बैसे अतिथिच्या समाधाना
तरी सारें त्याचिया मना येना
म्हणे, " राजा ! तूं निपुत्रीक ऐसा
तुझ्या पंक्तीसी बसूं सांग कैसा ? "

“ मुनीराया ! मज एकुलता बाळ
तोच अर्पियला न का लडीवाळ
अतां कोठुन मी पुत्रवंत देवा !
गरीबाचा प्रसाद अतां घ्यावा ”

मुनी सांगे, ‘जरि पुत्र तुझा नाहीं
पुत्र येइ न जों, न मी अन्न घेई’
म्हणे राजा, ‘हा काठिण कसा काळ
मुनी नाहीं मज नाहिं तसा बाळ’

मुनी बोले, ‘बाळास हांक मार
मला होताहे किती हा उशीर’
राय बोले, ‘बाळास कसा बाहूं ?
अतां रुसला तो कुठें तया पाहूं ?’

मुनी सांगे, ‘जरि बाळ बाहुनीयां
न ये तरि हा चाललों येथुनीया’
ऐकुनी तें नृप बोलविण्या लागे
‘बाळ चिलया ! रे धांव येइं वेगें

नको रागावूं रुसूं फुगूं राजा !
धाव घालीं राजसा वेगिं माझ्या
नातरी हा मुनिवर्य कोपुनीयां
दूर जातो, ये हांक ऐकुनीयां’

शब्द संपत जों तोंच बाळ येई
त्वरें कवटाळी पित्या धरी बाहीं
पिता माता उमजलीं क्षणामाजी
घरीं आलासे कवण राजयोगी

अंकिं चिलया घेऊन उमानाथ
पतीपत्नींच्या ठेवि शिरीं हात
शिवें स्थापियलें राजपदीं बाळा
भक्तवर्या तो घेउनियां गेला !



: : : २८ : : :

# माझें दैव खोटें !

वृत्त—ओवी

माझें दैव खोटें । कसा अन्यां दोष द्यावा ?
कसा शेवट चुकावा । लिहीलेला ?
माझें दैव खोटें । स्वयंवर झालें काय
उभा परशुराम राय । जीव घ्याया !
माझें दैव खोटें । नाहिं दीसलें पुनमुख
तोंच ओसरलें सुख । अयोध्येचें !
माझें दैव खोटें । घरीं पाय न ठेवीला
तोंचि वनवास आला । पायगुणें !
माझें दैव खोटें । वनामाजी जों ना आल्यें
कुबुद्धीनें दुखविलें । भावोजींना !
माझें दैव खोटें । शत्रुकरीं सांपडल्यें
धायी धायी रडवीलें । प्राणनाथा !
माझें दैव खोटें । रिपुराज नष्ट केला
रिपु संशय राहीला । तोची छळी !
माझें दैव खोटें । जरी अग्न साक्ष झाला
तरी शंकित राहीला । प्रजानन !
माझें दैव खोटें । सूर्यवंशिंची असोनी
हिंडतात रानींवनीं । बाळें माझीं !
माझें दैव खोटें । असोनियां काय पुत्र
आइ ! खरें नाहीं छत्र । पोटीं येई !

* * *

: : : २९ : : :

## खचतो माझा धीर !

चाल—सारंगीवाला

हे चिमण्या चंद्रा ! पाहुनि तुजला खचतो माझा धीर ! ॥ ध्रु०॥

मुनिनिं कथिलें, सत्य झालें
परि कशा हें भाळिं आलें
हे मोद खेद मज उलविति बाळा खळत न नयनीं नीर !

जन्म दिधला, करिं न धरिला
अजुनि पान्हा जों न फुटला
ये तोंच स्मरणीं आज्ञा ऋषिंची 'व्रजिं पोंचविं यदुवीर' !

देखिलें ना मुखहि पुरतें
तोंच दुरवी बालकातें
ती माता कसली ? घाता सजली ! म्हणतिल अदय अधीर !

त्यांत माजे तिमिर भारी
वीज मधुनी नभ विदारी
हे अकांडतांडव मांडिति नभिंचे घन गर्जुनि गंभीर !

मुसळधारा कोसळे ही
त्रस्त साऱ्या ह्या दिशाही
ही त्वेषें घोषें धावे यमुना तुडवुनि दोन्ही तीर !

शृंखलांनीं बद्ध असणें
तरिही कारापार होणें
हे बाळा ! कैसें घडतें असतां नष्ट कंस बाहीर !

## खचतो माझा धीर !

दुर्बळांचा देव वाली
पाठिराखा सर्व काळीं
ही आशानौका माझी राखो तोच संकटीं थीर !

ॐ ॐ ॐ

: : : २० : : :

# अतां तरि झणी येथून जाशील का ?

स्वानित

'झालें ओबवडें बघून; परतूं' स्नेही असें बोलले;
गेले धावत; बैल जुंपुनि जवें बैसावया लागले !
माझें चित्त विगुंतलें बघुनियां तें शांत रम्य स्थल
जाण्यानें मुळिं ना तयार तिथुनी सांगें जरी मी 'चल' !

होते डोलत उंच वृक्ष गगना जावानि जे टेंकले
होतें वाहत मंद मर्मर रवें गोमुख कुंडातलें !
होती बोलत बोल कांहितरिसे तेथील निःस्तब्धता
होतों ऐकत मी जरी न कळली शब्दांतली सार्थता !

माझे हालत कृष्ण केश कुरळे, तारुण्य बिंबे मुखीं
हाले पांघरली दुशाल हिरवी. गेलों बुडोनी सुखीं
ऐसें पाहि मला, कुणी सुनयना कुंडाकडे चालली
कुंभातें कसची भरी—टक तिची माझ्याकडे लागली !

एकांता बघुनी क्षणीं विवश ती लज्जावती बालिका !
चित्ता मीं म्हटलें, 'अतां तरि झणी येथून जाशील का ?'



: : : ३१ : : :

# आहें हांसत मी कसा वरिवरी माझें मला माहित !

स्वनित

हातीं घेउनियां गटे कविमणी, स्नेह्यांस टाळूनियां
गेलों दूर सुदूर दुःख हलकें चित्तांतलें व्हावया
जों जों मी विसरूं म्हणें, तसतसा दुःखास ये पूर तो
'मर्यादा नरबुद्धिला' बघुनियां कष्टें उले जीव तो !

आलों जाउनि दूर, दूर तरि ना हें दुःख चित्तांतलें
पाहोनी म्हटलें, मना ! तुज हवें भोक्तृत्व तें भोगलें !
ऐसें बोलत जों क्षणीं, निमिषिं ये कोठूनसा धावत
आनंदोर्मिसुहास्यनिर्भर असा माझ्यापुढें बालक !

त्याचें मोहक, मंजु, मुग्ध, मृदुसें हास्यध्वनी ऐकुनी
गेलें मन्मनिंचें दुरी क्षणभरी काहूर चित्तांतुनी
बाळा मीं म्हटलें मनीं, " हंस, गड्या ! हांसोनियां आज घे
जीवाची असली उषा परतुनी कोठूनियां बाळ ये ?

ऐसें कोठुनि मुक्तकंठ हंसणें भावें खऱ्या प्रेरित ?
आहें हांसत मी कसा वरिवरी माझें मला माहित ! "

* * *

: : : ३२ : : :

## इरलेवाली !

अंजनीगीत

वेडिंवांकडीं घेउनि वळणें
नागिण धांवे जणुं रोषानें
वाफा टाकित धांपापरि ही गाडी धडधडते !

वरतीं भिडली घन घनमाला
धूम धांवते दिग्भागाला
रथचक्रांच्या घरघरीपरी गगनीं गडगडते !

कड्यांकड्यांवर गार चारिवर
झडुन राहे सरीवरी सर
जिकडे तिकडे जलधारा ही सारखि खळखळते !

बांधावरतीं ऐशा वेळीं
नाजुक बाला काळिसांवळी
हादरणारें शिरिंचें इरलें धरण्या धडपडते !

वेष तिचा तो सुंदर साधा
लपवुनि गोंडस ठुसका बांधा
दावी यौवनकांती किति ती अंगीं मुसमुसते !

आज ना जरी धांवुनि येतिल
लावणि कसची शेतीं होइल
सासुसासरा उपाशिं देवा ऐशी पुटपुटते !

हातिं रोप परि गाडी निरखुनि
बघते अपुलें आलें का कुणि
दिसतां लज्जालहरी शरिरीं निमिषीं थरथरते !

## इरलेवाली !

प्रेमदृश्य हें बघण्या चोरुनि
गुपचिप वाहे नदि इंद्रायणि
स्वभालिं न असें भाग्य म्हणुन का मनिं ही हळहळते !

* * *

: : : ३३ : : :

# ध्यास व आस!

चाल—सारंगीवाला

मी शोधुनि शोधुनि दमलयें तुजला हृदयींच्या रमणा! ॥ ध्रु० ॥
कीर्ति तूझी ऐकुनीयां
चित्तिं वरिलें तुजसि राया
ना मीलन दर्शन म्हणुनी हुरहुर साराखि ही स्वमना!
तुज पहाया लोचनांनीं
धुंडिली मीं सर्व धरणी
परि भेट न देसी, लपसि असा कां आशेच्या किरणा?
खेळसी का खेळ अपुला?
प्राण परि हे होति गोळा
हा चाळा टाकीं, भेटीसाठीं ये रे भयशमना!
ही परीक्षा हट्ट कीं हा
कुठुनि मज ये ओळखाया?
हे सदया, यावी कणवा माझी तुजवांचुनि कवणा?
झुरुनि झुरुनी जीव गेला
अजुनि ऐसी जों न वेळा
तों धांव पावें कोणाच्या मग करशिल करहरणा?
चक्रवाकी वाहतांही
फुटुनि कंठीं जात तरिही
तूं काळरातींही साद न देसी काशि येना करुणा?
ध्यास तूझा लागलासे
आस दुजि ना राहिलीसे
या जन्मीं जरि ना जन्मांतरिं तरि गांठिन तव चरणा!

* * *

: : : २४ : : :

# चित्रकार रंजन !

स्वानित

“ बाई ! रात्रिं अवेळिं ह्या कुणिकडे ? हो, मीच तो रंजन !
हा घ्या दीप जरा, कवाड उघडें ठेवा, दुजें येथ न !
सांभाळा, पट, रंग, कागद पुढें आहेत भांडीं कुठें
रंगाचीं कलमें तशींच पडलीं आहेत एथें तिथें !

हें घ्या आसन ! पाहिल्यात कधिं का माझ्या तुम्हीं आकृती
ही पन्ना, विदूला, गरीब शबरी, ही तैशि तारामती ?
हो-हो–काढितसें कधीं तसबिरी ! केव्हां तुम्हांला हवी ?
मूर्ति ना तुमची ? जमेल अगदीं ! शंका नको अल्पही !

यांचें मोल ? अतां अतां मिळतसे ? येतें हजारावरी—
डोळां पाणि कशा ? गरीब म्हणुनी अश्रू कशा त्या तरी ?
बाळे ! मी तसबीर काढुनि तुझी देईन मोलाविना !
कोणालागिं हवी ? बरें समजलों ! नाथास देण्यास ना ?

भाग्यें त्वत्सम मुग्ध बाळ रमणा आराधितां पाहिली !
हें का मोल कमी ? पुन्हां परि नको हिंडूं अवेळीं मुली !



 

: : : ३९ : : :

## फसल्यें बाई !

चाल—भक्ति ग वेणी

फसल्यें बाई । सुख कपाळिं माझ्या नाहीं !
लग्नापासुनि साराखे कटकट
' प्रिये, सुंदरी ' अशि ही वटवट
अशि का कोठें असते तरि रित
लाजच नाहीं । सुख कपाळिं माझ्या नाहीं !
सदान्कदाचीं लिहिती गाणीं
तींच तींच मज दाविति वाचुनि
आलें काव्य तुझ्या का ध्यानीं ?
पुसती बाई । सुख कपाळिं माझ्या नाहीं !
आणा खोप्यासाठीं गजरा
म्हणतां खोवुनि एक मोगरा
उभी राहाविति तिष्ठत मजला
लिहितच कांहीं । सुख कपाळिं माझ्या नाहीं !
अपरात्रींही दिवा ढणढणा
कण्हती घेती बेसुर ताना
असा उजगरा कशि ती येना
झोंपच बाई । सुख कपाळिं माझ्या नाहीं !
रोज रोज हे गाणीं म्हणण्या
सांगुनि जाती आजि मी येना
आतुर यांच्या कोण गायना
नकळे कांहीं । सुख कपाळिं माझ्या नाहीं !

* * *

: : : २६ : : :

## अग माझ्या बाळा नका दूर नेऊं !

राग—तिलककामोद

अग माझ्या बाळा नका दूर नेऊं ! ॥ ध्रु० ॥

अकरा दिनहि न झालेल्याला ।
 काय कळे चिऊ आणि काऊ
मधुन मधुन हा आधिंच बिचके
 झेलुनी नका भीति दाखूं

ओकुन ओकुन घाबरतो गे
 कुणी नका मुखीं मुखा ठेवूं
दीठ कुणाची बाधेल परकी
 नका दुजाकरीं बाळ देऊं

वनमालि म्हणे माइ यशोदे
 अगे कशी नको वृथा होऊं

* * *

: : : ३७ : : :

## रोहिदासास !

चाल—तूं हुबेहूब साउली सारखी

“ अवकाळ पातला, दैव पाहि सत्त्वास
अणि कसा रोहिदासा तूं मज टाकुनियां गेलास !

तुज फुलामुलांची हौस लाडक्या बाळा
म्हणुनियां फुलें वेंचाया मीं जाउं दिलें वेल्हाळा !

परि मला नाठवे कधिं मीं अवमानिला
तो नागदेव कोपोनी सूडास्तव तुज डंखला !

अपराध कुणाचा शिक्षा किति कवणासी
हा हाय ! कृष्ण काळानें करपवलि कळी मम कशी !

तूं जातां फिरला काळ कसा बघ रोही
ह्या हरिश्चंद्रपत्नीच्या भाळीं ये नेणें शवही !

तव आश्रय तुटतां गत कैशी बघ बाळा
सुतभक्षकही म्हटलें रे लोकांनीं तव मातेला !

मज ठाव न आतां दुजा स्मशानाहून
तुज उचलुनि धावत आल्यें द्यायास कसा तरि अग्न !

कधिं काळीं दैवें दिसले जर पतिचरण
मी दावुं कसें रे आतां हें माझें त्यांना वदन !

ते पाहतांच मज पुसतिल रोही कोठें
मज शब्द कोणता बाळा काढाया आहे ओंठें !

ते धैर्यमेरु तरि फोडतील हंबरडा
छे प्राण निघोनी माझे येतील तुजकडे गड्या !

हें प्रेम विस्मरे काळाचाही पाश
ते दुःखभरानें मातें म्हणतिल तूं केला नाश !

रे कोण अतां वद कड माझी घेईल ?
या पंखहीन दीनेची गत कैशी रे होईल !

तो नाथ दूर हा पुत्र असा पेटवितां
त्या अर्थ जीवनीं कांहीं वाटत ना मजला आतां !

तो सुखी राहुं दे हरिश्चंद्र मत्प्राण
ही तारामति रोही रे ! येते बघ तुजमागून !"



: : : ३८ : : :

# गोफणवाली !

चाल—लोकगीतासारखी

वाजते फडाफड् गोफण माच्यावरी । पांखरें पळति पहा कशिं दुरी !

हा भाद्रपदांतिल तीव्र सूर्य तळपतो

किति जीव घाबरा जागजागिं थबकतो

परि शेतावर हा पक्षि किती लोटतो

त्यां उडविण्यास हा कंठ शोषला तरी । दाजिबा 'हा हा हा हा !' करी !

हा कांचा करुनी उघडा माचावर

हें मुंडाशाचें लोंबे शिरिं लक्तर

"र ! खाऊं देउन कसें चालवूं घर ?"

असें वदून घुमवुनि गोफण डोक्यावरी । चेवुनी मारि पांखरांवरी !

थकणार अतां तो शब्द तयें ऐकिला

ही दाजी भाकर घरुन आणिली तुला

ही भाकर वर घे हाणिन मी पांखरा

तू थांब म्हणोनी हौशी कर वर करी । चढाया झणि त्या माच्यावरी !

मग नसती गोफण घेउनि माच्यावर

ती चिमणी हौशी चिमणे करि वर कर

मग चिमणे फेंकी दगडहि चिमण्यांवर

जशि हौशि पित्याच्या श्रमपरिहारा करी । तशि न ती वदनांतील भाकरी !



: : : ३९ : : :

# चला, सुटी झाली !

जाति—रसरंग

**चला, सुटी** झाली, आतां खूप खूप खेळायचें ॥ ध्रु० ॥

मी मोटरवाला । तुम्ही गांवा चला
मी पैसे घेउन बसवायचें
मी पोंपों करित पोंचवायचें
मी बनेन इंजन । शिटी जोरांत फुंकीन
तुम्हि सर्वांनिं डबे बनायचें
तुम्हिं ओळींत मागुन चालायचें
मी बनेन चोर । तुम्हि शिपाइस्वार
मी लपुन छपुन निसटायचें
तुम्हिं शोधुन मला पकडायचें
मी होईन भट । पोथी सांगेन झट
तुम्हिं मला तूप वाढायचें
मी तट्ट अस्सं चालायचें
मी शाळामास्तर । तुम्हि मुलें शिकणार
मीं ऐटिंत आंत शीरायचें
तुम्हिं एकदम् उभें राहायचें
मिळुन करूं नाटक । सोंग सजवून झक
मध्यें नाहीं कुणीं हंसायचें
नाहीं नाहीं बरें भांडायचें !

* * *

: : : ४० : : :

## तिथें माझी असणार नाहिं आई !

वृत्त—दिंडी

विटी दांडूचा खेळ मजेदार
धूम चालुनियां लोटली बहार
गुंग झालेला बाळ खेळण्यांत
एक बाई मोटरिंतुनि पहात
बघाया त्या गुटगुटित बालकास
झणी थांबवि आपुल्या मोटरीस
तोंच मुलगा मोटरीवर चढून
म्हणे "गाडी कां दिली थांबवून?"
"तुला न्याया ही थांबविली पाहीं
झणी बाबांना विचारून येईं!"
'आइ म्हणते, बाबांस असे नेलें
वरी देवानें त्यांस बोलवीलें'
"बरें, जाउनियां कोट तुझा आण"
'आइ आहे शिवणार हो अजून!'
"बरें चल तूं ऐसाच मोटरींत
घरीं अमुच्या देईन तुला कोट
खेळ, खाऊ देईन तिथें राहीं"
बाळ उतरे मोटरीवरूनीही
"घरीं अमुच्या कां सांग येत नाहीं?"
'तिथें माझी असणार नाहिं आई!'

* * *

: : : ४१ : : :

# उत्सवाहून परतल्यावर

चाल—भूपतीवैभव सारखी

आइ ! आइ ! होइन मी खलाशि बंदरवाला
तूं येशिल का ग आजोळीं जायाला ?

आइ ! आइ ! होइन मी बोटीचा कप्तान
तूं येतां सोडिन बोट शीट फुंकून !

आइ ! आइ ! होइन मी लक्ष्मण छकडेवाला
तूं येशिल का ग देवाच्या जत्रेला ?

आइ ! आइ ! होइन मी विदुषक टाळेवाला
तूं येशिल का ग नाटक तें बघण्याला ?

आइ ! आइ ! फुगडि मी घालिन हंडीखालीं
तूं खेळशील ना फुगडी माझ्याजवळी !

"आइ ! आई ! येशिल ?" म्हणते "हो, हो," आई !
नयनांत लोटली तोंच अहा अंगाई !



: : : ४२ : : :

# हिची हौस

चाल—भक्ति ग वेणी

बघ हिची हौस । हिज हवा ग आयू. सी. एस. ॥ ध्रु० ॥

पहा हिची तर नाजुक यष्टी
चहा पिउनि घि ति चढली कांती
चष्मा बघ हा डोळ्यावरतीं
हाउ नाईस । हिज हवा ग आयू. सी. एस.

सशक्त इथला शिकला तरुण
हिजला वाटे खविसच पाहून
डेलिकेट ना धड मॅनर्स न
हाच चॉईस । हिज हवा ग आयू. सी. एस.

तुटाबुटाच्या स्वारी जवळुन
मोटारींतून केव्हां मिरविन
हींच स्वप्नें हिज रात्रंदिन
गुड् ग्रेशऽस । हिज हवा ग आयू. सी. एस.

बापा घरचा पैसा ओतुन
मोटर हुंडा सर्वहि देउन
गुलाम झाली जरि ही पूर्ण
नाहिं व्हाईस । तरि हवा ग आयू. सी. एस.

मडम सुरांनीं पैसा फस्त
झाला तरि ना होइल खिन्न
सोशिल झाली माराहाण
नाहीं सेन्स । पण हवा ग आयू. सी. एस.

* * *

: : : ४३ : : :

# आशि कशी ?

चाल—तूं हुबेहूब साउली

अशि कशी धुंद मस्तींत चालशी मुली !
चुरडणार किति तरुणांचीं हृदयें तूं या पाउलीं ?

आशि कशी बघसि तूं निर्भिड टक लावुनी !
डोळ्याशीं डोळा येतां बघ गोंधळ किति युवजनीं ?

अशि कशी हांससी मधुर हास्य लाडकें
घोंटाळुनि किति ठरवीती आजन्मदास्य तव निकें ?

अशि कशी धिटाइंत धीटाशीं बोलसी
ही काय मोहनी तुझी नम्र त्यां करुनि सोडिसी ?

अशि कशी उपेक्षुनि मूक कधीं राहसी
खंजीर उरीं तरुणांच्या कां उघड असा लाविसी ?

अशि कशी अचल तूं ताजमहालच जसा
मनिं विचारणा कसली गे निवड तूं युवक गुणि असा !

अशि कशी चंचले चाळवणी मांडिसी
हा यौवनसौरभ जातां पडशील उगा मग फशीं !

: : : ४४ : : :

## चिमण्यांस !

चालः—धिन्ना धिन्नक धिन्ना धी

या चिमण्यांनों या ग या
अंगणिं माझ्या नाचाया
टपटप पाउल वाजूं दे
झपझप पाउल चालूं दे

ही घ्या टाळी वाजवितें
हें घ्या गाणें मी म्हणतें
एकामागुन एक फिरा
हळूच वळवा मान जरा

चटकन उचला तांदूळ
भरकन फिरवा पाऊल
नाच कुणीं पाहिल अपुला
लपा ! उठा ! जा, दूर पळा !

ॐ ॐ ॐ

: : : ४९ : : :

# पांखरूं !

वृत्त—साकी

चाले गवतीं सुंदर खासें ठुसकें पांखरूं गोड
विचारवंतालागीं लावी निमिषामध्यें वेड !

ठुमकत जाई, थबकन गाई पाहुनि अंवतीं भवतीं
चिमणा दाणा चटकन वेंचुनि घेइ भरारी वरतीं !

गवतहि हंसलें ! डुललें पाहुनि सुंदर गोजिरवाणें
असलें पांखरूं पाहुनि कुणि का राहिल केविलवाणें ?

गड्या पांखरा ! क्षमा करीं मज उर माझें कालवतें
नको सांगणें—असेंच माझें गेलें रे बागडतें !

ॐ ॐ ॐ

: : : ४६ : : :

# छळ !

चाल—कृष्णा माझा सारखी

कान्ह्या ! असा कसा गडया । वराड वराड वर्डतोस ! ॥ ध्रु० ॥

गीत म्हनून् म्हनून् । गळा ग्येला बसून्
तरि कसा र तूं रडतोस ?

तान्ह्या वाग्यावाणी । ढोंशा देउनूशानी
अख्ख्या दूधा कीं र ढोंसलेंस !

कसा कांगावा हा । जरा उगा रहा
माय मारी जणूं दावितोस !

मारूं त्येना हांका ? । कंसा बोलावुं का ?
देउं टाकुन ? का मीटतोस ?

भीत कोठुन् तुला । जगत्पती बाळा ?
कशी भोळी माय छळतोस !

* * *

: : : ६७ : : :

# नंदा धलीं बाललाया धाला!

चाल:—चला सुटी झाली

गेंया पेंया तला, नंदाधलीं बाललाया धाला ॥ ध्रु० ॥
तुडुम् थुडुम् दुडुम्। नियति अवाद धुडुम्
थगला दोतुल नादावुनि देला!

दिधले तिकले दिवे। लागले नवे नवे
तहुंतले थातमात तेला!

दमल्या आया बाया। बाला पहावया
तला, अपला थवंगली आला!

दमले बापे थगले। देती दलपी पेले
तला, पला, पाय धणि उतला!

* * *

: : : ४८ : : :

# शबरीगीत

चाल—कळा ज्या लागल्या जीवा

" लतांनों ! सांगुं का तुम्हां उद्यां श्रीराम येणार !
वनाला सर्व ह्या आतां खरा आनंद होणार !

तुम्हां कोठूनिया ठावा कसा श्रीराम तो आहे
सुखस्यंदी झरा तेथें सदाचा वाहतो आहे

उद्यां पाहाल डोळ्यांनीं सुखाचा पूर्ण आराम
मुखें लागाल घोकाया " जय श्रीराम श्रीराम ! "

बघोनी नाथ हर्षानें मला उन्माद येईल
नका आणूं मनामाजी चुकोनी दोष होतील

लतांनों घालना पुष्पें ? झऱ्यांनों घाल ना पाणी ?
पहा ! हीं अर्पिलीं कैशीं फळें ह्या थोर वृक्षांनीं !

नव्हे-कोठून हीं उष्टीं ? जराशीं चावलेलीं हीं !
कडू कच्चीं फळें रामा कशीं देईन ग बाई ?

उद्यां श्रीराम येऊं दे ! तुम्हांला मीच दावीन
फळें हीं त्यास अर्पोनी सुखें त्यापायिं लोळेन !



: : : ४९ : : :

# काव्यगान !

वृत्त–दिंडी

एक मंगल उत्सवीं कवी तीन
बोलवीले करण्यास काव्यगान
यथाक्रम तें काव्यास गाइयेलें
बोधदायी सर्वांस पूर्ण झालें
विनति करितां पहिल्यास तो अडून
वदे कविता कशि म्हणूं पेटिवीण
खुळें नरडें कवि करी पेटि येतां
रडति बाळें बेहद्द ऐकुनी त्या
कवी दुसरा मग गाइ पेटिवीण
मधुनि सांगे कशि तान घेइ कोण
तिची सारीगम मधुनि मधुनि गाई
अशी कविता संपवी आपुली ही
पुढें तिसराही काव्य वाचुं लागे
'ध्वनी' कोठें तो समजून सांगे
होउनीयां मतभेद कवींमध्यें
काव्यचर्चा जुंपली ! काव्य थांबे !
तिघांचाही तो वाद आटपेना
कांहिं केल्या कुणि आंवरतें घे ना
श्रोतियांना मग काव्य कळुनि आलें
काव्य–गाना कवि कुठुनि बोलवीले !



: : : ९० : : :

# गोकुळ !

चाल—लोकगीतासारखी

वेलींमध्यें वेल कोमल रानींच्या जुईची
गोपींमध्यें तन कोमल यशोदाबाईची !

फूलांमध्यें नाजुक फूल जुईच्या वेलीचें
मूलांमध्यें नाजुक मूल यशोदामाईचें !

फांदीवरचें गोंडस फूल हलतें हलवीतें
यशोदेचें मोहक मूल डुलतें डुलवीतें !

रानींवनीं बाळझरा मध्येंची खळखळतो
नंदाघरीं बाळ कान्हा मध्येंची दुडदुडतो !

फांदीवर कोकिळ मंजुळ एकच सूर भरतो
घरभर बाळ कान्हा 'आई ! आई !' करतो !

सारा वेळ रानींवनीं चिमण्यांची किलबील
नंदाघरीं गोपिकांची अक्षयी गलबल

चटका रानवन मना सारखें लावीतें
पुराणींचें गोकुळ मना पुरतें मोहीतें.



: : : ५१ : : :

# कोंवळे बाण !

वृत्त–दिंडी

विलासांना बैसलों झुगारून
दिलें उपचारां दूर लाथडून
हंसत आहें हावेस धनवतांच्या
तसा भंगुर कीर्तीस मानवाच्या !

दिली हृदयावर मालकी प्रभूस
करित आहें अल्पशा स्वधर्मास
आपुल्याशीं सुम हंसत पहा आहे
तसा माझ्याशीं मीहि डुलत आहें!

परी "दादा ! कधिं आणणार बूट"
म्हणुनि विळखा घालून गळीं धीट
बाळ आणुनि आंसवें पाहतो हा
तुझा दारिद्या ! शर न सोसवे हा !

अशा बाणांनीं कोंवळ्या कशास
सख्या दारिद्या ! मला पीडितोस ?

* * *

: : : ६२ : : :

# सुंदरी !

चाल—वाजते फटाफट्

ही पाण्यालागीं घेउनि हंडा शिरीं । चालते विहिरिकडे सुंदरी !

हा विहिरीवरतीं आम्रवृक्ष डोलतो
कोकीळ ओतुनी कंठ बाग भारतो
कुइकुइ मोटेचा शब्द मधुनि चालतो

आमूढ सप्यादिशिं ऐकुनि बैलांवरी । सुंदरी बिचके हरिणीपरी !

पायांत सांखळ्या स्वच्छ शुभ्र शोभती
गरगरित पोटऱ्या यौवनास दाविती
किति माळिणचोळी खुलून दिसते हातीं

“र बाळा र बाळा” गीत चाललें वरी । लाजते ऐकुनि तें सुंदरी !

विहिरींत उतरुनी पटकन हंडा भरी
मग कष्टें चढवी एक एक पायरी
तों भिरभिरणारी मोट थांबली वरी

कांठाशीं कसा तरि हंडा आणुनि करीं । बघे कीं चढविल का कुणि शिरीं !

तों तेथ धांवुनी चटकन ये कोणसें
“शिरिं हंडा देतों, मोल काय” पुसतसे
“हें काय” म्हणत तों मोलहि झणि घेतसे

लव रोषानें लव लज्जेनें हांसरी । जाय मग हंडा घेउनि वरीं



: : : ६३ : : :

# हा हिंददेश माझा !

चाल—आनंदकंद ऐसा

निद्रेंतुनी ग जागा । तों शब्द कानिं येत
हा हिंददेश माझा । गातीं मुलें सुरांत
हा हिंददेश माझा । गातीं मुलें बिचारीं
मज मात्र ऐकुनी तें । उरिं लागली कुठारी
बाळांस काय ठावा । जो अर्थ त्या पदांत
जें काय ऐकतात । तें बाळ बोलतात
माझा म्हणावयाला । त्या थोर पूर्वजांनीं
बलिदान काय केलें । आतां तसें कुठोनी
हा हिंददेश माझा । म्हणतांच हिंदलोकीं
हंसतात सर्व आतां । तें ऐकु ये कुणा का ?
तारुण्य हिंददेशा । तव सर्व झोंपताहे !
स्वार्थाहुनी तयाला । वद मान्य काय आहे ?
त्या पीळ का कशाचा ? । त्या चीड का कशाची ?
त्या राग का कुणाचा ? । त्या हाय का कशाची ?
त्या पूर्ण तत्त्ववेत्त्या । कांहींहि चालताहे
बा दीन हिंददेशा । तव वालि कोण आहे ?
प्रगती दुजा जनांची । अन्यत्र होत आहे
ती तात मात्र तुझ्या । मानेस वाढताहे
हे पंजरस्थ पक्ष्या ! । नुसतें कशास गासी
हो काय गाउनीयां । गुंतून काळपाशीं ?

❀ ❀ ❀

: : : ९४ : : :

# चल सोड !

राग—भूप

चल सोड, जिवलगे ! मला, कशाची अट बसलिस घेऊन ॥ध्रु०॥

का अशी कावरी बघसी
छे अशी कशी गंहिवरसी
अशि वेळ पुन्हा का येइल केव्हां प्रेमरंगिं गुंतून ?

हा देश कुणाचा, कोण
करितसे येथ थैमान
हें ठावें तुज ना ? कां अडविसि मग जूं देतां फेंकून ?

ही हवा पारतंत्र्याची
जी रात्रंदिन तुज जाची
नी तशीच अपुल्या पुत्रांलागीं द्यावी का ठेवून ?

का स्वातंत्र्याचा नूर
जो प्राणांहुनिही प्यार
तो स्वर्गांतुनिही पाहुनि तनयीं जावें आनंदून !

गुरु अग्नि साक्ष ठेवोनी
जरि धरिला कर तव रमणी !
हा जीव होमतां देशालागीं वचनभंग कोठून ?

ये भेट, पुसूं दे डोळे
हे बाळ चुंबुं दे निजले
मी पडलों जर तर सांग तयांला कां मेलों झुंजून !

* * *

: : : ९९ : : :

# मुकुंदास !

चाल—वाटलें नाथ हो

तूं मोहविसी मन किति हें बाळमुकुंदा !
खेळण्या खिद्ळण्याविण ना तुजला धंदा ! ॥ ध्रु० ॥

हा नाद ऐकतां लागसि टकमक बघण्या
हा रंग पाहतां टाकसि उडि त्या धरण्या
हें कांहीं हलतां लागसि दुडुदुडु पळण्या
आंवरूं सांवरूं कसा तुझ्या या छंदा ?

तव शब्दा ऐकुनि राग मुळीं ना उरतो
तव रूपा बघुनी लोभ मनीं मावळतो
त्वत्स्पर्शी सारा कामभाव ओसरतो
कोमला ! विसरविसि पळभर तरि भवबंधा !

ही कळा झोंपली तिला जागवूं बघतों
ही आग लागली देशाला, चरफडतों
हें सत्य कळेना, जीव घाबरा होतो
या यत्नीं साऱ्या धीर तूंच सुखकंदा !

* * *

: : : ९६ : : :

# ऐकून !

चाल—गझल

सांगती कीं मी तुझा नी तूंहि माझी सुंदरी !
बोलवेना राहवेना ऐकुनी ती वैखरी

हालुनी बेताल होई भावसिंधू अंतरीं
नावरे ही अश्रुधारा आवरूं पाहें जरी

भेट नाहीं, भाष नाहीं लोटले ऐसे दिन
वाटलें तूतें कुठोनी मत्स्मृती व्हावी क्षण

खेळिमेळीं घेतलेल्या खेळिं आणा संपल्या
या जगींचें कोण पाळी सांग बोलां बोलल्या !

मानुनी ऐसें मनीं म्यां हाय होती घेतली
लौकरी होणार माझी येथिंची यात्रा पुरी

तोंच कानीं बोल ये कीं वांछिसी मन्मीलन
सिंचिला हो देह माझा लाधुनी संजीवन

येई येई वाट पाहीं मित्र हा प्राणेश्वरी
होउं दे कीं मी तुझा नी तूंहि माझी सुंदरी !

❦ ❦ ❦

: : : ५७ : : :

## जरा तरी बघ हंसून् !

चाल—नौकाविहाराची

'बससि कां माझ्यावर रुसून् । सानुल्या । जरा तरी बघ हंसून् ॥ ध्रु०॥

करुनियां बिछाना मऊ
पाळणियांत का नीजवूं
आंदळूं हलवुं डोलवूं ? ॥ सानुल्या० ॥

कढि भात वरण सानुल्या
करुं हातिं तुझ्या चिमुकल्या,
फोडुं पाळी करुनि गुदगुल्या ? ॥

भटो भटो कोकणांत का
घेतला फणस हा पिका,
हा खेळ तुजसि खेळुं का ? ॥

धर खारिक उष्टि न दिली
या चिमण्यांनीं चावली
कशि घेसि हातें ना मुळीं ? ॥

अजुन तूं बससि रागवून्
गाल हे तुझे फुगवून्
टाकुं का गट्टि फू करून्' ॥

बाळ तें जरा खुदकन
भासलें हांसलें क्षण
ओंठाशिं ओंठ जूळवून् ॥ नाचली । बाळ किती ती हंसून् !

* * *

: : : ५८ : : :

## शाळेमध्यें कसा जाऊं?

चाल—लावणीसारखी

आइ! शाळेमध्यें कसा जाऊं? ॥ ध्रु०॥

माझी शाळा किती तरि दूर
मुलें गेलीं पळुन भुरभूर!

पहा कसें पडे तरी ऊन
टाकिल माझे पाय पोळून

अग, खडे किती तरी वाटे
माझ्या पायीं बोंचतील कांटे

बरें जातों कसा तरि धांवून
मात्र खाऊ थोडा देईं काढून!

❀ ❀ ❀

: : : ५९ : : :

# सत्याग्रही वीरास !

फटका

नमोनमस्ते नमोनमस्ते हे सत्याग्रहि नरवीरा
कुरवंडुनि मम काय टाकितों तुझ्यावरुनियां हे धीरा !
कुठे जिवाची राखरांगुळी सत्यास्तव तूं करणारा
कुठे कवी मी कीर्तीसाठीं कागद काळा करणारा !
स्वार्थ होमुनी उभारलेले किल्ले तव हे शाबूद
बुडतिल माझे प्रासयमकयुत पोकळ बेगडि ताबूद !
नको खरडणें कीर्तीसाठीं बाडें कवनांचीं मोठीं
धन्य मला मी मानिन आला तव सत्कृतिलव जर गांठीं !

* * *

: : : ६० : : :

## नोकरि घरिं लागली!

चाल—मनोहरिणीसारखी

“ रिकामि मी कोठली । अतां तर । नोकरि घरिं लागली!
दिवसा आधिंच चहा उरकणें
आठाला पानावर बसणें
नवाआधिं घर पडे सोडणें
वेळ हवी साधली । अतां तर । नोकरि घरिं लागली !
हपीसांतले मित्र किती तरि
येतिल भेटायास अतां घरिं
हवाच ना चिवडा थोडा तरि
रीत हवी राखली । अतां तर । नोकरि घरिं लागली!
सत्यविनायक हवा कराया
नवस नको का पुरा कराया
फिइट हवी ना साऱ्यां याया
कशि फसतिल मंडळी । अतां तर । नोकरि घरिं लागली!
झाडलोट हें शिवणें टिपणें
धान्यधुन्य हें सर्व निवडणें
मला कोठचें सर्व संपणें
बाइ हवी पाहिली । अतां तर । नोकरि घरिं लागली!”

* * *

“ हंगामी मी नोकर नाहीं
कायमची मुळिं आशा नाहीं
तोंच हिची खर्चाची घाई
छान टकळि चालली । ‘अतां तर । नोकरि घरिं लागली’!”

: : : ६१ : : :

# आंसवें येती मन्नयनीं !

चाल—मनोहारिणीसारखी

न कळत हीं जमुनी । आंसवें येती मन्नयनीं !

खद्खद् हंसरें बालक दिसतां
खळखळणारा झरा भेटतां
विशुद्ध कोमल सूर ऐकतां
अंतर विरघळुनी । आंसवें येती मन्नयनीं !

मुसमुसणाऱ्या तारुण्यानें
चित्ताकर्षक सौंदर्यानें
उन्मादी वा प्रेमभरानें
अंतर मोहरुनी । आंसवें येती मन्नयनीं !

अपमानांना शतदुःखांना
गिळुनी गळल्या ज्यांच्या माना
अशांहि बघुनी पिकल्यां पानां
अंतर कालवुनी । आंसवें येती मन्नयनीं !

❀ ❀ ❀

: : : ६२ : : :

# पाहशिल चमत्कार येथुनी !

चाल—मनोहारिणीसारखी

'धीर धरीं तूं मनीं । पाहशिल चमत्कार येथुनी ॥ ध्रु० ॥

अखिल वृत्तपत्रांतुन लिहिनों
सर्व सभांतुन उभा राहतों
दोन तरी मी शब्द बोलतों
घेत जनां वळवुनी । पाहशिल चमत्कार येथुनी !

माझ्यासम का सुंदर वक्ता
टाकुनि देइल कुठलिहि जनता
स्थानिक राज्यीं मजला आतां
देतिल जन निवडुनी । पाहशिल चमत्कार येथुनी !

लढविन बाजू आंतुन चिथवुन
मिळविन पदव्या सरकारांतुन
नगराध्यक्षहि असाच होइन
खास समज हें मनीं । पाहशिल चमत्कार येथुनी !

खादी ही बघ कां मी घालित
राष्ट्रीय सभा आहे हेरित
कुणास ठावें येइल शोधित
पद तेंही मागुनी । पाहशिल चमत्कार येथुनी !

गांधी, शास्त्री, मला ठाउके
काय असे त्यांच्यामधिं इतुकें
झाले मोठे, केले तितुके
मीहि न कां, वद झणीं । पाहशिल चमत्कार येथुनी !'

* * *

" बरें बरें मज सर्व समजलें
कधींच आहे पूर्ण उमजलें
अन्न गार हें होत चाललें
आधीं घ्या जेवुनी । धरियला धीर कधिंच मीं मनीं ! "



: : : ६३ : : :

## जर तुझी आणि माझी प्रीत !

चाल—लावणीसारखी

जर तुझी आणि माझी प्रीत
कशा व्होवी तरी जनरीत ? ॥ ध्रु० ॥

नको लाजूं, म्हण शंकर
मीबि म्हणन् गौरी सुंदर !

हांक हवा तरी नांगूर
हा चाकुर घालिल भाकुर !

जोड गाडी, हाण हे बैल
मी बसन् शिवित वाकळ

हा तुझा न् माझा संसार
कशा व्होवें त्येला घर नि दार ?

दोन दिस पाखावाणि येणें
गीत गात अस्मानांत जाणें !

❀ ❀ ❀

: : : ६४ : : .

# आर्यभूस्तोत्र

वृत्त—मिश्रचामर

उत्तरेस तुंगशृंगवान हा हिमालय
दक्षिणेस गर्जतो प्रचंड वारिसंचय
विंध्य सह्य शैलराय धन्य जीस रक्षुनी
त्याच आर्यभूऋणास फेडणार जन्मुनी !

ब्रह्मपुत्र, सिंधु, जान्हवी कलिंदनंदिनी
वाहताति जेथ चित्स्वरूपिणी तरंगिणी
स्फूर्ति मूर्तिमंत संचरे जयांस सेवुनी
त्याच आर्यभूऋणास फेडणार जन्मुनी !

व्यास वाल्मिकी शुकादि धन्य जाहले मुनी
धर्म राम केशवादि जेथिंचेच वानुनी
शाक्यशंकरादि जीस पूत करिति बांधुनी
त्याच आर्यभूऋणास फेडणार जन्मुनी !

अशोक चंद्रगुप्त अक्बरादि जेथ भूपती
शिवाजि बाजि माधवादि वीरहा विराजती
आर्यभूमिकीर्तिडिंडिमा दिलें निनादुनी
त्याच आर्यभूऋणास फेडणार जन्मुनी !

शूर वीर राजपूत, धीर धूर्त मावळे
सुज्ञ पेशवे सदैव सज्ज जेथ जाहले
राखण्या स्वतंत्रतेस जीव वेळिं वेंचुनी
त्याच आर्यभूऋणास फेडणार जन्मुनी !

द्रौपदी मदालसा शकुंतला रघुप्रिया
इंदुराधिपा मिरा जिजादिका जिथें स्त्रिया
सुभाग्य सत्य साधण्यास सिद्ध सत्त्वशालिनी
त्याच आर्यभूऋणास फेडणार जन्मुनी !

लाल बाल पाल मालवीय गांधि गोखले
अहर्निशीं मनांत चिंतितील जेथिंचें भलें
आर्यभूस दिव्यकीर्ति साध्य हो कधीं झणी
त्याच आर्यभूऋणास फेडणार जन्मुनी !

शुक्लचन्द्र आपुल्यापरी निशा उजाळिती
तेथ काजवेहि यामिनीमुखा सुशोभिती
तवि आर्यभूमिबालबालिकांस बोधुनी
आर्यभूऋणास खास फेडणार जन्मुनी !



: : : ६५ : .

## सहेली ! चालो मेरे साथ !

राग–भूप

सहेली ! चालो मेरे साथ !
इस दुनियामें कोन दूसरा
जो मुझको दे हाथ !
मुझे पथिकको साथ तुम्हारा
बडे भाग्यकी बात
गीत बात आपसमें प्यारी
फिर क्या श्रमकी बात
नदनदियाभी मिलकर मिलती
अन्त समुंदर नाथ !

* * *

: : : ६६ : : :

# मैं न छोडुं गी !

राग—भैरवी

मैं न छोडुं गी ! ॥ ध्रु० ॥
आँख आँखसे नही मिलावो
मैं तो निगासे देखूं गी !
चाहे जहाँ तुम् जाना चाहो
मैं तो तुमको रोकूं गी !
जन्मजन्म तुम् मुझे फसावो
ना मीलन बिन ठअरूं गी

⁂

: : : ६७ : : :

# प्रार्थना

राग—भीमपलास

तारिं देवा अतां आर्यभूमी तरी

करयुगल जोडुनी प्रार्थितों श्रीहरी ॥ ध्रु० ॥

धेनु ही पंकगत सारखी हंबरत

प्रतिदिनीं खोल बघ खचत ती उद्धरीं!

जननिचें सांकडें प्राण करि कोरडे

बघुनियां तडफडे वत्स हा किति तरी!

दीनांस आधार तूंची महोदार

म्हणुनियां अवतार घेई हरि झडकरी!

# कवितांच्या अनुक्रमानुसार टीपा

४. प्रो० वैजनाथ काशीनाथ राजवाडे फर्ग्युसन कॉलेजच्या सेवेंतून मुक्त झाले, त्यावेळीं निरोप देण्यासाठीं हा श्लोक लिहिला.

५. 'हूड' नामक आंग्ल कवीची Bridge of Sighs ही कविता वर्गांत शिकवून झाली होती, त्याच वेळीं परीक्षेंत एका मुलीच्या पेपराची कत्तल ऐकून ही कविता फर्ग्युसन कॉलेज मासिकांत छापली. ह्या कवितेची गंमत अर्थात् त्यावेळीं होती.

८. प्रो० वासुदेव बळवंत पटवर्धन हे दिवंगत झालेले ऐकून ही कविता लिहिली.

१०. भृंग व कुमुदिनी यांमधील हा संवाद आहे. चंद्र हा कुमुदिनीचा नाथ. जुन्या संकेतांवर ही कविता आधारलेली आहे.

१७ व १८. यांतील रचना जुन्या लोकगीतांतील रचनेप्रमाणें शिथिल आहे.

२३, २५, २६, ३४. या चारही कवितांत एकोक्ति ( Monologue ) पद्धत स्वीकारली आहे.

२७. ध्रुवाख्यान लिहिणाऱ्या चिंतामणी कवीच्या छंदाच्या शैथिल्याचें यांत अल्प प्रमाणांत विडंबन आहे.

२८. चवथी ओळ–जीव घ्याया.

३०. आंबवडें भोर प्रांतांतील एक रमणीय स्थान.

३२. हें खडकाळें स्टेशनजवळचें दृश्य आहे.

३६ व ४६ व ५० यांतील रचना जुन्या गीतांच्या धर्तीवर आहे.

३९. हें एक अभिनयगीत (Action Song) म्हणून लिहिलें आहे.

४१. सहानुभूतीच्या अभावीं बराच वेळ दडवून ठेवलेलीं गुपितें सहृदय माणसाजवळ बोलावींशीं वाटतात.

४२. एका दुधखुळ्या मुलीची तिच्या मैत्रिणीनें केलेली थट्टा यांत आढळेल. असे विनोदाचे प्रकार वसतिगृहांतून चालतात.

४४. नवीनच कवाइत शिकणाऱ्या छोट्या मुलीचे उद्गार.

४७. 'बोबडा' गोप कृष्णजन्माची बातमी सवंगड्यास सांगत आहे.

५५. माझा धाकटा मुलगा मुकुंद यास उद्देशून.

६०. पहिल्या चार कडव्यांत शेजारणींजवळ कामाचा पाढा एका पत्नीकडून वाचला जात आहे, शेवटच्या कडव्यांत तिच्या उमेदवार पतीचे उद्गार आहेत.

६२. पहिल्या पांच कडव्यांत पतीचे व शेवटच्यांत पत्नीचे उद्गार आहेत.

